महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ व त्यांच्याशी संलग्न संस्थातील शिक्षक/शिक्षकेतर कर्मचाऱ्यांपैकी परिभाषित अंशदान निवृत्ती वेतन योजना / राष्ट्रीय निवृत्ती वेतन योजनेंतर्गत योजनेच्या सभासद असणारा कर्मचाऱ्याचा १० वर्ष सेवा होण्यापूर्वी सेवेत असताना मृत्यू पावल्यास नामनिर्देशित व्यक्तीस/ कायदेशीर वारसास द्यावयाच्या सानुग्रह अनुदानाच्या लाभासाठी लेखाशीर्ष उपलब्ध करुन देणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,

## शासन निर्णय क्रमांक मपवि २०२१/प्र.क्र.१७/पदुम २ (माफसू)

मंत्रालय, मुंबई - ४०००३२.

दिनांक : ०५ मे, २०२२.

<u>संदर्भ :-</u> १) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक: अंनियो-२०१७/प्र.क्र.२९/सेवा-४, दिनांक २९ सप्टेंबर २०१८

२) शासन निर्णय, कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग क्र. मपवि २०१९/प्र. क्र. ३०/माफसू, दिनांक १८ जुलै, २०१९.

३) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक: अंनियो-२०१७/प्र.क्र.२९/सेवा-४, दिनांक १० फेब्रुवारी, २०२१

४) शासन शुध्दीपत्रक, कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग क्र. मपवि २०१९/प्र. क्र. ३०/माफसू, दिनांक ०६ डिसेंबर, २०२१.

<u>प्रस्तावना -</u>

उपरोक्त संदर्भ क्र.१ येथील वित्त विभागाच्या शासन निर्णयानुसार राज्य शासनाच्या कर्मचाऱ्यांपैकी परिभाषित अंशदान निवृत्ती वेतन योजना/राष्ट्रीय निवृत्ती वेतन योजनेंतर्गत योजनेचा सदस्य असणारा कर्मचारी १० वर्ष सेवा होण्यापूर्वी सेवेत असतांना मृत्यू पावल्यास त्याच्या नामनिर्देशीत व्यक्तीस / कायदेशीर वारसास रु.१०.०० लक्ष इतके सानुग्रह अनुदान अधिक कर्मचाऱ्याच्या खाती जमा असलेली संचित रक्कम देण्याबाबतचा निर्णय घेण्यात आला आहे. सदर्भ क्र २ येथील दिनांक १८ जुलै, २०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये सदर योजना महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ व त्यांच्याशी संलग्न संस्थातील कर्मचाऱ्यांना लागू करण्यात आलेली आहे. सदर शासन निर्णयामध्ये लेखाशिर्ष नमूद केलेले नाही. तथापि, संदर्भ क्र. ३ येथील वित्त विभागाच्या दिनांक १० फेब्रुवारी, २०२१ च्या परिपत्राकन्वये स्वतंत्र लेखाशीर्ष घेण्याबाबत सूचना देण्यात आल्या आहेत.

त्यानुसार महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ व त्यांच्याशी संलग्न संस्थासाठी स्वतंत्र लेखाशीर्ष उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ व त्यांच्याशी संलग्न संस्थातील कर्मचाऱ्यांपैकी शिक्षक/शिक्षकेतर कर्मचाऱ्यांपैकी परिभाषित अंशदान निवृत्ती वेतन योजना/राष्ट्रीय निवृत्ती वेतन योजनेंतर्गत योजनेचा सभासद असणारा कर्मचारी १० वर्ष सेवा होण्यापूर्वी सेवेत असताना मृत्यू पावल्यास नामनिर्देशित व्यक्तीस/ कायदेशीर वारसास द्यावयाच्या सानुग्रह अनुदानाच्या लाभासाठी खालील लेखाशीर्ष मंजूर करण्यात येत आहे :-

| **लेखाशिर्ष** | **लेखाशीर्षाचे मराठी नाव** | **लेखाशीर्षाचे इंग्रजी नाव** |
|---|---|---|
| मागणी क्र. | जी - ६ | G – 6 |
| मुख्य लेखाशीर्ष | २०७१ - निवृत्ती वेतने व इतर सेवानिवृत्ती लाभ | 2071 – Pensions and Other Retirement Benefits |
| उपमुख्य लेखाशीर्ष | ०१ - नागरी | 01 – Civil |
| गौण शीर्ष | १०३ - अनुकंपा भत्ते | 103– Compassionate Allowance |
| गट शीर्ष | ०० - | 00 - |
| उप गट शीर्ष | (००) (१३) महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ व त्यांच्याशी संलग्न संस्थातील कर्मचारी / अधिकारी यांच्यासाठी परिभाषित अंशदान/ राष्ट्रीय निवृत्ती वेतनेंतर्गत सानुग्रह अनुदान (अनिवार्य) | (00) (13) Defined Contributory / National Pension Scheme Ex gratia, for employee of Maharashtra Animal and Fisheries Sciences University and its affiliated institutes. (committed) |
| उद्दिष्ट | ०४ निवृत्ती वेतन विषयक खर्च | 04 – Pensionary Charges |
| संकेतांक | २०७१ ०८०२ | 2071 0802 |

२. हे आदेश वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. १७१/२०२२/व्यय-२, दिनांक २१/०४/२०२२ आणि वरिष्ठ लेखा अधिकारी, प्रधान महालेखाकार यांचे कार्यालय (लेखा व हकदारी)-I, महाराष्ट्र यांच्या अनौपचारिक पत्र क्र ख.वि /चा-१/कृ. पशुसं. डे.व. म.वि./यू ओ आर-१२८/२०२१-२२/६८४ दिनांक ०८/०३/२०२२ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

३. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संकेतांक २०२२०५०५११४०५७१३०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने.

CHANDRAKALA DEVRAM GAVIT

Digitally signed by CHANDRAKALA DEVRAM GAVIT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=db6efff5f9cbf5f55184ebe2b33934e3a1ad06cbfbad22ff0cbcf88f3c89e1e4, pseudonym=6AC1004D14020B1CF4AC873549BD26748DFEB090, serialNumber=B16E6FECB684A6091AF2BD729716C8F32004FE5EF01B9D220C1A6D0EDDC63E52, cn=CHANDRAKALA DEVRAM GAVIT
Date: 2022.05.05 11:41:41 +05'30'

**( चंद्रकला गावित )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. आयुक्त, पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. कुलगुरु, महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, नागपूर.
३. कुलसचिव, महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, नागपूर.
४. नियंत्रक (वित्त व लेखा), महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, नागपूर.
५. महालेखापाल महाराष्ट्र १/२ (लेखा परिक्षा) /(लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.
६. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवि मुंबई
७. जिल्हा कोषागार अधिकारी , नागपूर
८. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई ( व्यय-२/ अर्थ-१५)
९. निवड नस्ती/ पदुम -२ (माफसू).